संस्थात्मक लवाद धोरणानूसार कार्यवाही करणेबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र. २०/का-१९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक. ४ मार्च, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र. २०/का-१९, दि. १३.१०.२०१६.
२) शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२०/का-१९, दि. ०१.१२.२०१६.
३) शासन निर्णय क्र. एआरबी / प्र.क्र. ०१ /२०१७/ का - १९,दि.२८.०२.२०१७.

**शासन परिपत्रक**

वर नमूद क्र. १ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्यास "संस्थात्मक लवाद धोरण" लागू करण्यात आले असून सदर धोरणाच्या अनुषंगाने क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये २० वा मजला, एक्सप्रेस टॉवर, नरीमन पाईंट, मुंबई-२१ येथे स्थित असलेल्या "मुंबई आंतरराष्ट्रीय लवाद केंद्रास (MCIA)" शासन मान्यता देण्यात आली आहे.

प्रस्तुत परिपत्रकाद्वारे आता सर्व प्रशासकीय विभागांना सूचित करण्यात येते की त्यांनी क्रमांक १ व ३ येथील शासन निर्णय त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांच्या निदर्शनास आणावा व सदर धोरणातील धोरणात्मक उपक्रम या शीर्षका अंतर्गत क्रमांक ३ नुसार आता ज्या करारनाम्यांचे व्यावसायिक मूल्य रु. ५,००,००,०००/- (रुपये पाच कोटी) किंवा त्यापेक्षा जास्त आहे अशा सर्व शासकीय करारात म्हणजे राज्यपालांद्वारे अथवा त्यांच्या वतीने तसेच राज्य शासनाचा कंपन्या आणि अन्य शासकीय महामंडळे व शासकीय निगम यांच्या वतीने करण्यात येणाऱ्या संविदा व करारनाम्यात शिफारस केल्याप्रमाणे संस्थात्मक लवाद कलम अंतर्भूत करावे व वाद हा शासनाने मान्यता दिलेल्या मुंबई आंतरराष्ट्रीय लवाद केंद्राकडे (MCIA) संदर्भित करावा आणि लवाद धोरणाचा अनुषंगाने पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०३०४११५६५१८९१२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

Rajendra D Sawant

Digitally signed by Rajendra D Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6c5df198d588de75e335db20487f4df45c73eca4ce5875cd77fd8b1924a3fdf8, cn=Rajendra D Sawant
Date: 2017.03.04 11:57:37 +05'30'

( राजेंद्र सावंत )
विधि सल्लागार-नि-सहसचिव

**प्रति,**

१. सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयाीन विभाग
२. सर्व जिल्हाधिकारी
३. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग